केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत
उल्हासनगर शहराच्या मलनिस्सारण
प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक अमृत-२०१६/प्र.क्र.४६०(१)/नवि-३३**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
**दिनांक :- १३ डिसेंबर, २०१६**

वाचा :- १. शासन निर्णय नगर विकास विभाग क्र: अमृत-२०१५/प्र. क्र.१९७/नवि-३३, दिनांक १३ ऑक्टोबर, २०१५.
२. अमृत अभियानांतर्गत गठीत राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीच्या दिनांक ०२/१२/२०१६ रोजी पार पडलेल्या बैठकीचे इतिवृत्त
३. शासन परिपत्रक, नगर विकास विभाग क्र: अमृत-२०१६/प्र.क्र.१६३/नवि-३३, दिनांक १६ मे, २०१६ व १२ जुलै, २०१६.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाची अंमलबजावणी संदर्भाधीन शासन निर्णयान्वये राज्यामध्ये सन २०१५-१६ वर्षापासून राज्यामध्ये करण्यात येत आहे. सदर अभियानांतर्गत पाणीपुरवठा, मलनिस्सारण, पर्जन्यजलवाहिनी, नागरी परिवहन व हरित क्षेत्र विकास इ. पायाभूत सुविधांची निर्मिती अभियान शहरांमध्ये करण्यात येणार आहे. त्यानुसार सदर अभियानांतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये राज्याच्या रु. १९८९.४१ कोटी किंमतीच्या आराखडयास केंद्र शासनाने मान्यता दिलेली असून सदर आराखडयामध्ये उल्हासनगर शहराच्या मलनिस्सारण प्रकल्पाचा समावेश आहे.

०२. अमृत अभियानांतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या मलनिस्सारण प्रकल्पाचा सविस्तर प्रकल्प अहवाल हा उल्हासनगर महानगरपालिकेमार्फत तयार करण्यात आला आहे. केंद्र शासनाच्या सूचनेनुसार सदर प्रकल्प अहवालास अमृत अभियानांतर्गत गठीत करण्यात आलेल्या राज्यस्तरीय तांत्रिक समितीने व तदनंतर राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीने मान्यता दिलेली आहे. त्यानुसार राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीने केलेली शिफारस व शासनाच्या मान्यतेच्या अनुषंगाने अमृत अभियानाच्या सन २०१५-१६ या आर्थिक वर्षाच्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या उल्हासनगर शहराच्या मलनिस्सारण प्रकल्पास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत सन २०१५-१६ या आर्थिक वर्षामध्ये केंद्र शासनाकडून मंजूर केलेल्या राज्य वार्षिक कृति आराखडयामध्ये समाविष्ट असलेल्या उल्हासनगर शहराच्या मलनिस्सारण प्रकल्पास संदर्भाधीन शासन निर्णयातील अटी व तरतुदीच्या अधीन राहून खालील परिच्छेद क्र. २ मधील विवरणपत्रात नमूद केल्यानुसार या शासन निर्णयाद्वारे प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे.

०२. उल्हासनगर शहर मलनिस्सारण प्रकल्पातील उपांगे व त्यांचे किंमतीचे विवरण पुढीलप्रमाणे आहे:-

| Sr. No. | Name of Sub Works | Amount (Rs.) |
|---|---|---|
| **1** | Survey | 3,26,070 |
| **2** | Collection System (RCC & HDPE - 150 mm to 1100 mm - total length -5990 m) | 19,94,14,133 |
| **3** | Sewage Pumping Main (DI K9 - 600, 700 & 800 mm) | 51,41,888 |
| **4** | Sewage Pumping Station | 11,70,96,947 |
| **5** | Sewage Treatment Plant (Capacity- STP 2- 31.26 MLD, STP 3- 20.72 MLD) | 52,55,22,210 |
| **6** | Weir & Division work for Ambika Nala | 49,55,339 |
| | **Net Cost** | **85,24,56,587** |
| | **Say** | **85.24** |
| | **प्रकल्प पूर्ण करण्याचा कालावधी** | **कार्यादेश दिनांकापासून १८ महिने** |

**०३.** उल्हासनगर शहर मलनिस्सारण योजनेचा केंद्र शासनाकडून मंजूर राज्य वार्षिक कृति आराखडयानुसार वित्तीय आकृतिबंध पुढीलप्रमाणे आहे.

| अ. क्र. | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेची मंजूर किंमत (डीपीआर नुसार) | केंद्र शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या ५०%) | राज्य शासनामार्फत अनुज्ञेय अनुदान (प्रकल्प किंमतीच्या २५%) | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचा सहभाग (प्रकल्प किंमतीच्या २५%) |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १ | उल्हासनगर महानगर पालिका | रु. ८५.२४ कोटी | रु. ४२.६२ कोटी | रु. २१.३१ कोटी | रु. २१.३१ कोटी |

**०४.** संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयानुसार उल्हासनगर शहर मलनिस्सारण प्रकल्पास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मंजूरी देण्यात येत आहे **:-**

४.१ सदर प्रकल्पासाठी कार्यान्वयन यंत्रणा उल्हासनगर **महानगरपालिका** राहील.

४.२ केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सुचना व राज्य शासनाच्या संदर्भाधीन शासन निर्णयानुसार सदर प्रकल्पाची अंमलबजावणी करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.३ राज्य शासनाने शासन परिपत्रक क्रमांक अमृत-२०१६/प्र.क्र.१६३/नवि-३३, दिनांक १३ मे, २०१६ व १२ जुलै, २०१६ नुसार विहित केलेल्या कार्यपध्दतीनुसार सदर प्रकल्पाची निविदा प्रक्रिया व अंमलबजावणी विहित कालावधीमध्ये पूर्ण करणे संबंधित कार्यान्वयन यंत्रणेवर बंधनकारक राहील. या प्रकल्पासाठी पाईपसह सर्व बाबींचा निविदेत समावेश करण्यात यावा.

४.४ सदर प्रकल्पाच्या निविदा या महाराष्ट्र जीवन प्राधिकरणाने अमृत अभियानातील मलनिस्सारण प्रकल्पांसाठी निर्गमित केलेल्या नमुना निविदा प्रपत्रानुसार करणे कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.५ सदर प्रकल्पाच्या कामाचे कार्यादेश प्रशासकीय मंजूरीच्या आदेशापासून ४० दिवसांच्या आत देण्यात येतील याची कार्यान्वयन यंत्रणेने दक्षता घ्यावी.

४.६ राज्यस्तरीय उच्चाधिकार समितीच्या बैठकीतील इतिवृत्तामध्ये नमूद करण्यात आलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित अभियान शहरांस व कार्यान्वयन यंत्रणेस बंधनकारक राहील.

४.७ केंद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानांतर्गत केंद्र शासनाने विहित केलेल्या सुधारणांची (Reforms) पूर्तता विहित कालावधीत पूर्ण करणे संबंधित अभियान शहरास बंधनकारक राहील.

४.८ **निधी वितरणाची कार्यपद्धती:-** केद्र शासन पुरस्कृत अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार केंद्र शासन हिश्याचा निधी हा तीन टप्यात (२०टक्के + ४०टक्के + ४०टक्के) वितरीत केला जाणार आहे. त्यानुसार केंद्र शासनाकडून वितरीत निधीच्या प्रमाणात राज्य हिश्याचा निधी केंद्र हिस्सा वितरीत करताना सोबत वितरीत केला जाईल.

४.९ सदर प्रकल्पासाठी केंद्र व राज्य शासनाच्या हिश्याचा प्रथम हप्त्याचा निधी कार्यादेश दिल्यानंतर महानगरपालिकेस वितरीत करण्यात येईल. त्यानुसार केंद्र शासनाने विहित केल्यानुसार त्याबाबतचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनास सादर केलेनंतर पुढील हप्त्याचा केंद्र हिश्याचा व त्याप्रमाणात राज्य हिश्याचा निधी वितरीत करण्यात येईल.

४.१० अभियानाच्या वित्तिय आकृतीबंधानुसार केंद्र व राज्य शासनाने वितरीत केलेल्या निधीच्या प्रमाणात नागरी स्थानिक स्वराज संस्था हिश्याचा निधी उभा करून सदर खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र केंद्र शासनाने विहित केलेल्या प्रपत्रात शासनास सादर करणे संबंधित नागरी स्थानिक स्वराज संस्थेवर बंधनकारक असणार आहे.

४.११ सदर प्रकल्पासाठी निधी वितरीत करताना दिलेल्या सूचनांनुसार, सदर प्रकल्पासाठी प्राप्त निधी शासनाच्या प्रचलित धोरणानुसार विहीत केलेल्या बँकांमध्ये, स्वतंत्र खाते उघडून ठेवणे अनिवार्य राहील. सदर प्रकल्पासाठी वितरीत केलेला निधी त्याच प्रकल्पासाठी वापरणे बंधनकारक असून त्याचा वापर इतर प्रयोजनार्थ केल्यास सदर बाब ही गंभीर वित्तिय अनियमितता समजण्यात येईल.

४.१२ राज्य शासनामार्फत नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेसाठी प्रकल्प मंजूर झाल्यानंतर, मूळ प्रकल्प किंमतीमध्ये कोणत्याही कारणास्तव वाढ झाल्यास त्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील. राज्य शासनामार्फत त्या करिता कोणतेही वाढीव अनुदान उपलब्ध केले जाणार नाही.

४.१३ सदर प्रकल्पाची अंमलबजावणी विहित कालावधीत पूर्ण करण्याची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१४ प्रकल्पाचे काम सुरु झालेनंतर प्रकल्प व्यवस्थापक सल्लागाराने कामाची गुणवत्ता व देयके प्रमाणित केलेनंतर उपलब्ध निधीच्या मर्यादेत कामाची देयके १५ दिवसांत संबंधित कंत्राटदारास देण्याची जबाबदारी संबंधित कार्यान्वयन यंत्रणेची राहील.

४.१५ अमृत अभियानाच्या मार्गदर्शक सूचनेनुसार सदर प्रकल्पासाठी महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रकल्प व्यवस्थापक सल्लागार म्हणून कार्य करील. त्यापोटी कार्यान्वयन यंत्रणा ३ टक्के इतके शुल्क शासनामार्फत विहीत करण्यात येणाऱ्या कार्यपध्दतीनुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणास अदा करेल. तसा ठराव महानगरपालिकेने करणे बंधनकारक राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१२१३१०५३२९५६२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

Pandurang Jotiba Jadhav

Digitally signed by Pandurang Jotiba Jadhav
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=300d785e12fdc19db0612f1ffdf83e54efe7da2b1bc63d18df8e09b3c7eece65, cn=Pandurang Jotiba Jadhav
Date: 2016.12.13 17:58:20 +05'30'

**(पां.जो.जाधव)**
**सहसचिव ,महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा .मुख्यमंत्री यांचे सचिव.
२. मा.मंत्री (पाणीपुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव.
३. मा.राज्यमंत्री (नगरविकास) यांचे खाजगी सचिव
४. अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग यांचे स्वीय सहायक
५. अप्पर मुख्य सचिव,नियोजन विभाग यांचे स्वीय सहायक
६. प्रधान सचिव,मलनिस्सारण विभाग यांचे स्वीय सहायक
७. सचिव,नगरविकास विभाग (२) यांचे स्वीय सहायक
८. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण,मुंबई.
९. आयुक्त तथा संचालक ,नगरपरिषद प्रशासन संचालनालय ,मुंबई.
१०. विभागीय आयुक्त, कोकण विभाग, बेलापूर, नवी मुंबई.
११. जिल्हाधिकारी, ठाणे
१२. जिल्हा प्रशासन अधिकारी, ठाणे
१३. आयुक्त, उल्हासनगर महानगरपालिका, उल्हासनगर, जि. ठाणे
१४. निवडनस्ती, नवि-३३.